**जय पार्वतीमाता शैक्षणिक,सामाजिक व सांस्कृतिक मंडळ, अहमदनगर संचालित जय पार्वतीमाता ज्युनिअर कॉलेज अहमदनगर या उच्चमाध्यमिक शाळेचे, बारा तोटी कारंजा, जि.अहमदनगर येथे स्थलांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३१८/प्र.क्र.४४३/१८/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ११ मे, २०२३

**वाचा :**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/प्र.क्र.४०१/एसएम-१ दिनांक २८ जुलै, २०२१.

**संदर्भ :- १) विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे यांचे जा.क्र./शिउसं/पुवि उमाशि-१/२०१८, दि.१५.०६.२०१८.**

**प्रस्तावना :-**

जय पार्वतीमाता शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक मंडळ, अहमदनगर संचालित जय पार्वतीमाता ज्युनिअर कॉलेज (पूर्वीचे नाव - शहीद विठ्ठल भालसिंग ज्युनिअर कॉलेज) अहमदनगर, या कला, वाणिज्य-मराठी माध्यम व विज्ञान - इंग्रजी माध्यमाच्या विनाअनुदानित कनिष्ठ महाविद्यालयाचे बारा तोटी कारंजा, माळीवाडा जि.अहमदनगर येथील स्थलांतरास कार्योत्तर मान्यता देण्याचा संदर्भाधीन पत्रांन्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संस्थेन उपरोक्त संदर्भीय कनिष्ठ महाविद्यालयाची इमारत जुनाट व जीर्ण झाल्यामुळे, बारा तोटी कारंजा, माळीवाडा जि.अहमदनगर येथे स्थलांतर केले आहे. त्यामुळे सदर कनिष्ठ महाविद्यालयाच्या स्थलांतरास खालील अटी व शर्तीवर कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच सर्व विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाहीत.

(५) भविष्यात शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतर करण्यात येणार नाही, याबाबत संस्थेने दक्षता घ्यावी.

(६) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१११७३५५५७९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2023.05.11 17:35:49 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे.
३. शिक्षणाधिकारी,( माध्यमिक) जिल्हा परिषद, अहमदनगर.
४. अध्यक्ष/ सचिव, जय पार्वतीमाता शैक्षणिक,सामाजिक व सांस्कृतिक मंडळ, अहमदनगर
५. निवडनस्ती (एसएम-१).